श्री.शतानिक भागवत, विभागीय वन अधिकारी गट-अ (वरिष्ठ श्रेणी) यांच्या बदलीबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०२२/प्र.क्र.४५/फ-८.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ एप्रिल, २०२२

**शासन आदेश :-**

गोरेवाडा प्रकल्प राज्य शासनासाठी महत्वाकांक्षी उपक्रम आहे. नजिकच्या भविष्यात सदर प्रकल्पांतर्गत कामे कालबध्दरित्या पूर्ण करावयाची असल्याने प्रशासकीय कारणास्तव श्री.शतानिक भागवत, विभागीय वन अधिकारी गट-अ (वरिष्ठ श्रेणी) यांना विभागीय व्यवस्थापक, गोरेवाडा, प्राणीसंग्रहालय, नागपूर या पदावर बदलीने पदस्थापना देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

२. त्यानुषंगाने शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कामे पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) अंतर्गत तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने श्री.शतानिक भागवत, विभागीय वन अधिकारी गट-अ (वरिष्ठ श्रेणी) यांची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहेत. :-

| अ.क्र. | अधिका-यांचे नाव व पदनाम | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.शतानिक भागवत, विभागीय वन अधिकारी-२, ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर | विभागीय व्यवस्थापक, गोरेवाडा, प्राणीसंग्रहालय, नागपूर | रिक्त पदी |

**३.** श्री. भागवत यांनी बदलीच्या पदावर तात्काळ हजर व्हावे. याबाबतची माहिती संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास sunil.pandhare@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर सादर करावी.

**५.** संबंधित अधिकाऱ्यांना शासनाच्या पूर्वपरवानगी शिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

**५.** सदर बदली आदेशानुसार संबधित अधिकारी तात्काळ बदलीच्या पदावर हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारे असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

**६.** सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२२०४१८१३४०३१८३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL PANDURANG PANDHARE

Digitally signed by SUNIL PANDURANG PANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f874792415b92ba519384cacb41b53a89cf93dbd96d4be1f7d97fb6326eed47, pseudonym=E356063E1710100620E953749C8FA6F85E9A154E, serialNumber=8B7DC58E83C9774E4419A7AEEAC77EAE7CDEA272D759DFB29451BCFE7E3F04C9, cn=SUNIL PANDURANG PANDHARE
Date: 2022.04.18 13:43:43 +05'30'

**( सुनिल पांढरे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ लि., नागपूर
७) प्रकल्प संचालक, ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
८) महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र -२, नागपूर
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/ चंद्रपूर
१०) प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
११) संबंधित अधिकारी (प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत)
१२) निवड नस्ती (फ-८ कार्यासन).